**"स्व. मोतीरामजी लहाने कृषि समृध्दी प्रकल्प" बंद करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन , दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१७ /प्र.क्र.८/८-अे
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ३१ ऑगस्ट, २०१८

**संदर्भ:**

१. शासन पत्र, नियोजन विभाग क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३५/(भाग-२) / का. १४११ , दि.२९ /८/२०१६,
२. शासन पत्र, नियोजन विभाग क्रमांक संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३६/कार्यासन - १४११,दि.१७/१०/२०१७
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक राकृवि-०८१५/ प्र.क्र. ६९/राकृवियो कक्ष, दि.०४/०६/२०१६
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक हअप्र -०७१६/ प्र.क्र.८२/ राकृवियो कक्ष दि. ०७/०७/२०१६

**प्रस्तावना:**

राज्यामध्ये एकाच प्रयोजनार्थ कार्यान्वित असलेल्या दोन किंवा त्याहून अधिक अशा मर्यादित कालावधी करिता सुरू करण्यात आलेल्या योजना, ज्यांचा कालावधी संपुष्टात आला आहे अशा योजना, आणि ज्या योजनांची जिल्हा वा राज्य स्तरावर दुरूक्ती होत आहे अशा योजना बंद करण्याचे शासनाचे धोरण आहे. त्याचप्रमाणे, राज्य शासनामार्फत राबविल्या जाणाऱ्या एकसमान उद्दिष्टे असलेल्या योजना एकत्रित करून त्या अन्य योजनामध्ये समाविष्ट करून राज्यातील योजनांची संख्या कमी करण्याबाबत शासनाचे धोरण आहे.

शेतीतील नापिकी, कर्जबाजारीपण व अन्य कारणांमुळे विदर्भ व मराठवाड्यातील १४ जिल्हे राज्य शासनाने शेतकऱ्यांच्या आत्महत्यांने ग्रस्त असल्याचे जाहीर केले होते. यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यात शेतकऱ्यांच्या वाढत्या आत्महत्यांच्या पार्श्वभूमीवर, सर्वंकष कृषि विकासाद्वारे तसेच प्रचलित योजनांच्या एकत्रीकरणाद्वारे (Convergence) पथदर्शी तत्वावर "स्व. मोतीरामजी लहाने कृषी समृध्दी प्रकल्प" सन २०१६-२०१७ ते २०१८-१९ या कालावधीमध्ये राबविण्यास शासनाने दिनांक ०४ जून, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान केली होती. त्याचबरोबर, शेतकऱ्यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त १४ जिल्ह्यांतील शेतकऱ्यांच्या समस्यावर मात करणे हेतू आणि घटत्या उत्पन्नामुळे शेतकऱ्यांनी तणावग्रस्त न होता पूर्वीच्या सुस्थितीत वेळोवेळी पुर्नस्थापित व्हावे म्हणून जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाची आखणी राज्य शासनाने हाती घेतली होती. शासनाने सदर प्रकल्प विदर्भ व मराठवाड्यातील शेतकऱ्यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त असलेल्या १४ जिल्ह्यांसह जळगाव जिल्ह्यात सन २०१८ ते २०२४ या कालावधीकरिता राबविण्यास

दिनांक १७ जानेवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे व प्रकल्पाची अंमलबजावणी सन २०१७-१८ पासुन सुरु करण्यात आली आहे.

"स्व. मोतीरामजी लहाने कृषी समृध्दी प्रकल्प" आणि "नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प" मुलत: "एकात्मिक शेती विकास" संकल्पनेवर आधारित आहेत. मोतीरामजी लहाने कृषि समृध्दी प्रकल्पातील यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यांचा नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पात समावेश करण्यात आलेला आहे. सदर दोन्ही प्रकल्पात पात्र असणारे लाभार्थी हे आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातीलच असून दोन्ही योजनांची उद्दिष्टे, घटक व अपेक्षित फलनिष्पती समान स्वरूपाची आहे, या पार्श्वभूमीवर शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. या शासन निर्णयान्वये, सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून "मोतीरामजी लहाने कृषि समृध्दी प्रकल्प" बंद करण्यात येत आहे आणि सदर जिल्ह्यांमध्ये नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाची अंमलबजावणी सुरु करण्यात आली आहे.
२. सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या क्र. संकीर्ण-२०१५/ प्र.क्र. ३५/ (भाग-२) का. १४११, दिनांक २९ ऑगस्ट, २०१६ मधील सुचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.
३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०८३११४५५३६९४०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant
Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.08.31 14:58:19 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मंत्री. (कृषि ) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
३. सर्व सन्माननीय विधानसभा व विधापरिषद सदस्य.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
५. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६. अपर मुख्य सचिव (कृषि) कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
८. प्रकल्प संचालक , नानाजी देशमुख कृषि संजिवनी प्रकल्प, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई-५.
९. जिल्हाधिकारी, यवतमाळ.

१०.जिल्हाधिकारी, उस्मानाबाद.
११.महालेखापाल, महाराष्ट्र -१ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ), मुंबई.
१२.महालेखापाल, महाराष्ट्र -२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ), नागपूर.
१३.संचालक ( विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे ( ५ जादा प्रतीसह).
१४.संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, म.रा. पुणे.
१५.संचालक ( लेखा व कोषागारे), मुंबई.
१६. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (यवतमाळ व उस्मानाबाद).
१७. जिल्हा कोषागार अधिकारी. (यवतमाळ व उस्मानाबाद).
१८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२०.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय,विधानभवन, मुंबई (२प्रती),
२१.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
२२.उप सचिव, सांख्यिकी,नविन प्रशासकीय नियोजन विभाग इमारत, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
२३.उप सचिव (व्यय-१)/अर्थसंकल्प-१३),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४.सर्व सहसचिव / उप सचिव /अवर सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२५.सहाय्यक संचालक (लेखा-२),कृषि आयुक्तालय, पुणे.
२६.लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे.
२७.निवड नस्ती ( कार्यासन ८-अे ).